**लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांनी सुनावणीसाठी नेमलेल्या दिनांकास संबंधित अधिका-यांनी उपस्थित रहाण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शासन परिपत्रक क्रमांक-एलपीएल- १०१०/प्र.क्र.१४/२०१०/१५,**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,**
**दिनांक- २८ जानेवारी, २०१०**

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक सा.प्र.वि. क्र. एलपीएल-१५९५/प्र.क्र.९०/९५/१५ दि. १५ मार्च १९९७
२) शासन परिपत्रक सा.प्र.वि क्र. एलपीएल १०९७/प्र.क्र.१३४/९७/१५, दि. ८ जानेवारी १९९८
३) शासन परिपत्रक,सा.प्र.वि.क्र.एलपीएल-१०००/प्र.क्र.१११/२०००/१५, दिनांक ८ मार्च, २००१.
४) शासन परिपत्रक,सा.प्र.वि.क्र.एलपीएल-१२०२/प्र.क्र.५६/२००२/१५, दिनांक २० जून, २००२
५) शासन परिपत्रक,सा.प्र.वि.क्र.एलपीएल-१००४/प्र.क्र.६०/२००४/१५, दिनांक २८ सप्टेंबर, २००४
६) शासन परिपत्रक सा.प्र.वि. क्र. एलपीएल १००६/प्र.क्र.१९/२००६/१५ दि. ८.६.२००६

**<u>शासन परिपत्रक</u>**

मा. लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांच्या कार्यालयाकडून प्राप्त होणाऱ्या संदर्भांना विधीमंडळ कामकाजाप्रमाणे प्राथम्य देवून त्यानुसार विहित कालावधीत कार्यवाही करण्याबाबतच्या सूचना वेळोवेळी देण्यात आल्या आहेत. याबाबत एकत्रित सूचना संदर्भाधीन दिनांक ८ मार्च, २००१ व दिनांक २०.६.२००२ व दि. ८.६.२००६ च्या परिपत्रकान्वये पुन्हा निदर्शनास आणण्यात आल्या आहेत. असे असूनही सदर सूचनांचे योग्यरित्या पालन केले जात नसल्याचे मा. उप लोक आयुक्त यांनी दि. १३.१.२००९ रोजीच्या सूनावणीत निदर्शनास आणून दिले व त्याबाबत सूचना द्याव्यात असे निर्देश दिले आहेत.

याबाबत मा. लोक आयुक्त आणि उप लोक आयुक्त यांनी महाराष्ट्र लोक आयुक्त व उप लोक आयुक्त अधिनियम १९७१ च्या कलम ११ च्या तरतुदीनुसार एखाद्या प्रकरणाच्या संदर्भात सुनावणीच्यावेळी त्यांनी आमंत्रित केलेले संबंधित अधिकारी उपस्थित न राहता विषयाशी अपरिचीत असलेल्या कनिष्ट अधिका-यांना पाठविले जाते. आमंत्रित अधिकारी सुनावणीच्यावळी उपस्थित न राहील्याने महत्वाच्या व गुंतागुंतीच्या प्रकरणात सविस्तर तपशिला अभावी त्रुटी राहतात. परिणामी लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांच्यामार्फत करण्यात येणा-या अन्वेषणात दिरंगाई होते. अशी नाराजी व्यक्त करुन लोक **आयुक्त व उप लोक आयुक्त यांच्याकडे सुनावणीच्यावेळी त्यांनी जर <u>विभागीय सचिवांना</u> आमंत्रित केले असेल तर त्यांनीच उपस्थित रहावे. प्रतिनिधी पाठवू नये. जर काही कारणांमुळे सचिवांना सुनावणीस हजर राहता येत नसेल तर सुनावणीच्या दिनांकाला संबंधित प्रकरणांची सांगोपांग माहिती असलेला उप सचिव / सह सचिव दर्जाच्या अधिका-यालाच सुनावणीस पाठविण्यात यावे, त्यांच्यापेक्षा कनिष्ठ अधिकाऱ्यांना पाठवू नये.**

तरी सर्व मंत्रालयीन विभाग यांना अशी सुचना करण्यात येते की, त्यांनी लोक आयुक्त आणि उप लोक आयुक्त यांचेकडील सुनावणी संदर्भात उपरोक्त कार्यपध्दत काटेकोरपणे अंमलात आणली जाईल याची दक्षता घ्यावी.

प्रस्तुत परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१००१२८१८३०४४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(मे. चिं. पाटील)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

मा.राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा.उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खासगी सचिव,
मुख्य सचिव, यांचे स्वीय सहायक,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव, प्रधान सचिव, सचिव,
प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई, (पत्राने)
प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई, (पत्राने)
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, (पत्राने)
प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ( विधानसभा), मुंबई, (पत्राने)
प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ( विधान परिषद), मुंबई, (पत्राने)
सचिव, महाराष्ट्र लोक सेवा आयोग, मुंबई,(पत्राने)
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग /कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.

--------